**अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या धर्तीवर समकक्ष गट कर्ज व्याज परतावा योजना महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ (मर्यादित) आणि वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्यादित) या दोन्ही महामंडळांमार्फत राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : इमाव २०१९/प्र.क्र.१२/महामंडळे**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- २८ जानेवारी, २०१९**

**प्रस्तावना :-**

अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या धर्तीवर समकक्ष गट कर्ज व्याज परतावा (रु.१०.०० लाख ते रु.५०.०० लाख पर्यंत) योजना महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ (मर्यादित) आणि वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्यादित) या दोन्ही महामंडळांमार्फत राबविण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव मा.मंत्रिमंडळाच्या पुढील बैठकीमध्ये सादर करण्याचे निदेश मा.मुख्यमंत्री महोदयांनी दि.०८.०१.२०१९ रोजी झालेल्या बैठकीमध्ये दिले आहे. त्यानुसार दि.१५/०१/२०१९ रोजीच्या मा. मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्यता दिलेला प्रस्ताव खालीलप्रमाणे आहे :-

" १. अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या धर्तीवर समकक्ष रुपये १०.०० लक्ष ते जास्तीत जास्त रु.५०.०० लक्ष गट कर्ज व्याज परतावा योजना महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ (मर्यादित) आणि वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्यादित) या दोन्ही महामंडळांमार्फत राबविण्यास मान्यता देण्यात यावी.

२. या दोन्ही महामंडळामार्फत गट कर्ज व्याज परतावा योजना (बँकेमार्फत) राबविण्यासाठी प्रत्येकी रु.५०.०० कोटी असे एकूण रु.१००.०० कोटी इतके अर्थसहाय्य मंजूर करण्यात यावे.

३. सदर योजनेवरील अनुदान तीन वर्षाच्या कालावधीसाठी वितरीत करण्यास मान्यता असावी.

४. सदर योजना मंत्रिमंडळ टिपणीतील अ.क्र.१ ते १० प्रमाणे योजेनेच्या स्वरुपास मान्यता असावी. "

मा.मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

शासन याद्वारे अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या धर्तीवर समकक्ष गट कर्ज व्याज परतावा (रु.१०.०० लाख ते रु.५०.०० लाख पर्यंत) योजना महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ (मर्यादित) आणि वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ(मर्यादित) या दोन्ही महामंडळांमार्फत राबविण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर योजनेचे स्वरुप खालीलप्रमाणे राहील :-

१. **उद्देश :-** इतर मागासवर्ग प्रवर्गातील महामंडळाच्या निकषांनुसार विहीत केलेल्य वार्षिक उत्पन्न मर्यादेतील उमेदवारांच्या बचत गट, भागीदारी संस्था, कंपनी अधिनियम २०१३ अंतर्गत), LLP. FPO अशा शासन प्रमाणिकरण प्राप्त संस्थांना बँकेतर्फे स्वयंरोजगार उद्योग उभारणी करिता जे कर्ज दिले जाईल, त्या कर्ज रक्कमेवरील व्याज परतावा हा बँक प्रमाणीकरणानुसार महामंडळाकडून अदा केला जाईल.

२. **आर्थिक सहाय्य :-**नॉन क्रिमिलेअर करिता असलेल्या कौटुंबिक वार्षिक उत्पन्न मर्यादेत (सक्षम प्राधिकरणाने वेळोवेळी दिलेल्या प्रमाणपत्रानुसार) असलेल्या उमेदावारांच्या गटासंदर्भात, बँकेकडून प्रती गटास रु.१०.०० लक्ष ते जास्तीत जास्त रु.५०.०० लक्षपर्यंतच्या घेण्यात आलेल्या उद्योग उभारणी कर्जावर ५ वर्षापर्यंत अथवा कर्ज कालावधी या पैकी जे कमी असेल ते, कर्ज मंजुर केलेल्या गटाने वेळेत कर्जाचे हप्ते भरल्यास, हप्ता भरल्यावर जास्तीत जास्त १२ टक्के व्याज दराच्या आणि रु.१५.०० लाखाच्या मर्यादेत त्यातील व्याजाची रक्कम त्यांच्या आधार लिंक बँक खात्यात दरमहा महामंडळमार्फत जमा करण्यात येईल. सदर योजना संपुर्णपणे संगणकीकृत असून प्रक्रीया सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (पीएफएमएस) या अथवा तत्सम संगणक प्रणालीद्वारे राबविण्यात येईल.

३. **प्रकल्पाचे क्षेत्र महाराष्ट्र राहील :-**

३.१ कृषी, संलगन व पारंपारिक उपक्रम

३.२ लघु उद्योग व मध्ये उद्योग -अ) उत्पादन ब) व्यापार व विक्री

३.३ सेवा क्षेत्र

४. **प्रकल्प क्षेत्रानुसार लक्ष्यांक अंदाजपत्रक :-**

| | | |
|---|---|---|
| १. | कृषी, संलग्न व पारंपारिक उपक्रम | एकूण आर्थिक तरतुदीच्या ६०% रक्कम |
| २. | लघु उद्योग व मध्यम उद्योग -(अ) उत्पादन (ब) व्यापार व विक्री | २) व ३) साठी एकूण आर्थिक तरतुदीच्या ४०% रक्कम |
| ३. | सेवा क्षेत्र | |

## ५. लाभार्थी अटी व शर्ती :-

**५.१** गटातील लाभार्थी हे महाराष्ट्र राज्याचा रहिवासी असावा.

**५.२** गटातील लाभार्थ्यांचे कर्ज खाते आधारकार्ड लिंक असणे अनिवार्य राहील.

**५.३** गटातील लाभार्थ्यांचे किमान वय १८ ते ४५ वर्षे असावे.

**५.४** गटातील लाभार्थ्यांचे महामंडळाच्या वेबपोर्टलवर महामंडळाच्या संगणक प्रणालीवर नांव नोंदणी अनिवार्य.

**५.५** गटातील सर्व लाभार्थ्यांचे प्रमाणित वार्षिक कौटुंबिक उत्पन्न, नॉन-क्रिमीलेअर करीता असलेल्या कौटुंबिक वार्षिक उत्पन्न रु.८.०० लाखाच्या मर्यादेत (सक्षम प्राधिकरणने वेळोवळी दिलेल्या प्रमाणपत्रानुसार ) असावे.

## ६. इतर अटी :-

**६.१ खालील प्रकारचे गट या योजनेंतर्गत पात्र असतील.**

अ. शासन मान्य बचत गट (इतर कोणत्याही शासकीय योजनेत मान्य असलेले)

ब. भागिदारी संस्था (निबंधक, महाराष्ट्र राज्य, भागिदारी संस्था, मुंबई यांनी प्राधिकृत केलेले)

क. सहकारी संस्था (जिल्हा उपनिबंधक यांनी प्राधिकृत केलेले)

ड. कंपनी / Limited Liability Partnership (LLP) / Society (कंपनी कायदा, २०१३ च्या Web Portalनुसार)

**६.२** गटातील उमेदवाराने अर्ज करते वेळी या प्रकल्पासाठी व यापुर्वी महामंडळाव्या वा इतर महामंडळाच्या कोणत्याही योजनांचा लाभ घेतलेला नसावा.

**६.३** गटातील उमेदवाराने अर्ज करते वेळी या प्रकल्पासाठी व यापुर्वी महामंडळाच्या वा इतर महामंडळाच्या कोणत्याही योजनांचा लाभ घेतलेला नसावा.

**६.४** गटाने कर्ज प्रकरण हे सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (पीएफएमएस) या अथवा तत्सम संगणक प्रणालीद्वारे प्रकरण हाताळण्यास सक्षम असलेल्या बँकेत केलेले असावे.

**६.५** गटातील उमेदवाराने /व्यक्तीने या महामंडळाच्या व इतर महामंडळाच्या गट किंवा वैयक्तिक योजनांचा लाभ घेतलेला नसावा.

**६.६** ही योजना सद्यस्थितीत अस्तित्वात असलेल्या व्यवसायाच्या विस्तारासाठी व योजनेची अंमलबजावणी सुरु केल्यानंतर स्थापन झालेल्या नवीन उद्योगांसाठी लागू असेल.

**६.७** गटाच्या भागीदारांचे किमान रु.५०० कोटीच्या वर ठेवी असलेल्या व कोअर बँकींग सिस्टम असलेल्या राष्ट्रीयकृत/शेड्युल्ड बँकेत खाते असावे.

**६.८** गटातील सर्व सदस्यांचा सिबिल क्रेडीट स्कोअर किमान ५०० इतका असावा.

## ७. गटांची नाव नोंदणी :-

गटातील उमेदवारंची महामंडळाच्या अधिकृत वेबपार्टलवर अर्ज सादर करणे बंधनकारक असेल. प्रस्ताव सादर केल्यावर दिलेल्या अटी व शर्तीनुसार प्रस्ताव पात्र ठरत असल्यास

गटास संगणीकृत सशर्त हेतुपत्र (Letter of Intent )दिले जाईल. गटाने य आधारे बँकेकडून प्रकरणावर कर्ज मंजुर करुन घ्यावे.

**८. महामंडळामार्फत गटाच्या कर्जाच्या व्याज रक्कमेचा परतावा :-**

८.१ गटाने वेळेत कर्जाचे हप्ते भरल्यास, भरल्यावर त्यातील व्याजाची रक्कम (१२ टक्केच्या मर्यादेत अथवा रु.१५.०० लाखाच्या मर्यादेत) त्याचा आधार लिंग बँक खात्यात दरमहा महामंडळामार्फत जमा करण्यात येईल. सदर योजना पुर्णपणे संगणकीकृत असून प्रक्रीया सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (पीएफएमएस) या अथवा तत्सम संगणक प्रणलीद्वारे राबविण्यात येईल.

८.२ महामंडळ केवळ बँकेने वेळेत वसूल केलेली योग्य व्याज रक्कम अदा करेल, या ऐवजी इतर कोणतेही Charges/Fees/अदा करणार नाही.

**९. प्रशासकीय बाबींवरील खर्च :-**

९.१ प्रतीवर्षी देय होणाऱ्या निधीच्या उपलब्धतेमधून या योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी.

९.२ सदर योजनेस प्राप्त होणाऱ्या सहाय्यक अनुदानातून २ टक्के रक्कम महामंडळाच्या अधिकारी / कर्मचाऱ्यांचे प्रशिक्षण, योजनेची प्रसिध्दी, योजनेच्या संगणकीकृत अंमलबजावणीकरीता लागणारा खर्च तसेच इतर प्रशासकीय खर्च करण्यात यावा.

**१०. योजनेचे सर्वसाधारण संनियंत्रण :-**

**अ.** दरवर्षी महामंडळामार्फत केले जाईल.

**आ.** महामंडळाचे जिल्हा स्तरावरील कामकाज महामंडळाचे जिल्हा व्यवस्थापक मुख्यालयाच्या मार्गदर्शनाखाली पाहतील.

**११.** लाभार्थी गटाची निवड करण्यासाठी संबंधित जिल्ह्याच्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात येत असून गटास कर्ज देणाऱ्या संबंधित बँकेचे व्यवस्थापक व संबंधित जिल्ह्याचे सहायक आयुक्त, समाजकल्याण हे समितीचे सदस्य असतील आणि संबंधित जिल्ह्यातील संबंधित महामंडळाचे जिल्हा व्यवस्थापक हे समितीचे सदस्य सचिव असतील. सदर समिती त्यांच्या जिल्ह्यातून गट कर्ज व्याज परतावासाठी प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी करेल व निवड करेल. समितीने निवड केलेल्या प्रकरणात महामंडळाकडून व्याज परतावा नियमानुसार व आवश्यकतेनुसार त्यांच्या आधार संलग्न बँकेत जमा करेल.

**०२.** या योजनेचा आढावा १ वर्षानंतर घ्यावा व सदरची योजना यापुढे सुरु ठेवावी किंवा बंद करावी याबाबतचा निर्णय घेण्यात यावा.

**०३.** सदर योजनेसाठी नविन लेखाशिर्ष प्राप्त करुन घेण्याची कार्यवाही करण्यात यावी.

**०४.** सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १२/२०१९/१४१३ , दि. १४.१.२०१९तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.-----, दि.११.१.२०१९ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यत आला असून त्याचा संकेतांक २०१९०१३११२३५५८८६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2019.01.31 12:46:51 +05'30'

**(भा.र.गावित)**
**सह सचिव , महाराष्ट्र राज्य**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव
३. मा.विरोधी पक्ष नेता (विधानसभा / विधान परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. अध्यक्ष/उपाध्यक्ष/ व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ, मुंबई
६. अध्यक्ष/ उपाध्यक्ष/व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ, मुंबई
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
८. मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव
९. आयुक्त समाज कलयाण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे
११. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, कोकण भवन, नवी मुंबई (दोन प्रती)
१२. महालेखापाल (ले.व अ.) महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर
१३. महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी मुंबई / ठाणे
१५. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१६. वित्त विभाग (का-व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प-३/साउ) मंत्रालय, मुंबई
१७. नियोजन विभाग(का.१४१३) मंत्रालय, मुंबई
१८. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई
१९. सर्व प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय आणि विकास महामंडळ (मर्या.)
२०. सर्व प्रादेशिक व्यवस्थापक विमुक्त जाती व भटकया जमाती विकास महामंडळ (मर्या.)
२१. सर्व व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय आणि विकास महामंडळ (मर्या.)
२२. सर्व व्यवस्थापक विमुक्त जाती व भटकया जमाती विकास महामंडळ (मर्य.)
२३. प्रधान सचिव (विजाभज) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
२४. सह सचिव (विजाभज), विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय,मुंबई
२५. निवडनस्ती (महामंडळे) विजाभज, इमाव व विमाप्र विभाग, मंत्रालय, मुंबई